**सार्वजनिक बांधकाम विभागातील कामाच्या वाटपाच्या पुनर्रचनेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः ईएसटी-१११७/प्र.क्र.३१/प्रशा-२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २७ सप्टेंबर, २०१८

वाचा:- १) शासन परिपत्रक क्रमांक : एपीपी - १११५/प्र.क्र. २०७/प्रशा-२, दिनांक २१.११.२०१५.
२) शासन परिपत्रक क्रमांक : ईएसटी - १११७/प्र.क्र.३१/प्रशा-२, दिनांक २९.०६.२०१८.

## शासन परिपत्रक

सार्वजनिक बांधकाम विभागातील सचिव (रस्ते) व सचिव (बांधकामे) यांच्यामध्ये संदर्भाधीन परिपत्रकान्वये कामकाज वाटप करण्यात आले आहे. सदर परिपत्रकासोबतच्या **परिशिष्ट -अ** व **परिशिष्ट - ब** मध्ये दर्शविण्यात आलेल्या विषयांच्या वाटपानुसार प्रकरणे सचिव (रस्ते) व सचिव (बांधकामे) यांना सादर करण्याबाबत निदेशित करण्यात आले आहे.

२. तथापि, सद्यस्थितीमध्ये विभागातील काही कार्यासनांच्या नस्त्या / प्रकरणे सचिव (बांधकामे) यांच्यामार्फत सचिव (रस्ते) व प्रधान सचिव (सार्वजनिक बांधकाम) यांना सादर करण्यात येतात असे दिसून आले आहे. विभागाच्या कामकाजामध्ये सुसूत्रता व गतिमानता राखण्याच्या दृष्टीने प्रकरणांचे सादरीकरण करतांना शासन परिपत्रक दिनांक २१/११/२०१५ व दिनांक २९/०६/२०१८ अन्वये देण्यात आलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन होणे आवश्यक आहे. यास्तव, परिपत्रकासोबत जोडलेल्या **परिशिष्ट-अ** व **परिशिष्ट-ब** मधील कामाच्या वाटपानुसार सचिव (रस्ते) किंवा सचिव (बांधकामे) यांच्यामार्फत प्रधान सचिव (सार्वजनिक बांधकाम) यांना नस्ती/ प्रकरणे सादर करावीत. या सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८०९२७१७२९१५६४१८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sampat Dasharath Suryavanshi

Digitally signed by Sampat Dasharath Suryavanshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e2d0677dc3b9f523d6452edd479c3b2edc0887c9102b4130ae3ef3dd803b7322, serialNumber=f8d5f07d73b60d73112565db9baee680ffade9b8758d5a695368e1d3656632dd, cn=Sampat Dasharath Suryavanshi
Date: 2018.09.27 17:37:10 +05'30'

**( सं.द. सूर्यवंशी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम विभाग (सार्वजनिक उपक्रम वगळून), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम विभाग (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा. राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. मा. राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा यांचे खाजगी सचिव
८. मा. मुख्य सचिवांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
९. प्रधान सचिव (सा.बां.), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. सचिव (रस्ते), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. सचिव (बांधकामे), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
१३. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई
१४. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, (सर्व)

१५. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई,
१६. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१७. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख,
१८. सर्व कार्यासन अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९. कार्यासन प्रशा-२ (निवडनस्ती करिता).

(शासन परिपत्रक, सा.बां.विभाग, क्रमांक ईएसटी-१११७/प्र.क्र.३१/प्रशा-२, दि. २७.०९.२०१८ चे सहपत्र)

सार्वजनिक बांधकाम विभागातील सचिव (रस्ते) व सचिव (बांधकामे) यांचे मधील कामाचे वाटप.

परिशिष्ट- अ

सचिव (रस्ते)

| | |
|---|---|
| १ | वर्ग १ वरिष्ठ अधिका-यांच्या बदल्यांची प्रकरणे तसेच सेवा व आस्थापना विषयक सर्व बाबी (कार्यकारी अभियंता/ अधीक्षक अभियंता/ मुख्य अभियंता/ वरिष्ठ वास्तुशास्त्रज्ञ/ उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ/ मुख्य वास्तुशास्त्रज्ञ इ.). |
| २ | राजपत्रित व अराजपत्रित अधिकाऱ्यांच्या शिस्तभंग विषयक बाबी. |
| ३ | राज्य महामार्ग. |
| ४ | जिल्हा रस्ते. |
| ५ | रोजगार हमी योजनेअंतर्गत रस्त्यांची कामे. |
| ६ | खाजगीकरणातून करावयाचे रस्ते. |
| ७ | रस्त्यांचे हस्तांतरण, रेल्वे मार्गावरील पूल व अपघात विषयक बाबी (राष्ट्रीय महामार्ग वगळून). |
| ८ | औद्योगिक विकासासाठी (रस्ते व इमारती इ.) करावयाच्या मूलभूत सोयी. |
| ९ | संबंधित रस्ते व पूल यांच्या कामांना प्रशासकीय मान्यता देणे तसेच सदर कामाच्या मंजूरीपेक्षा झालेल्या अतिरिक्त खर्चास प्रशासकीय मंजूरी देणे. |
| १० | पूर्व आणि पश्चिम द्रुतगती महामार्गाबाबत सर्व बाबी, पश्चिम घाटमार्गाची एकात्मीकृत विकास योजना. |
| ११ | जनजाती उपयोजनांतर्गत रस्ते, राज्य परिवहन निधी अंतर्गत रस्ते. |
| १२ | कंत्राटदारांची नोंदणी. |
| १३ | सल्लागार समिती व केंद्रीय सहाय्य (Consultative Committee and Central Assistance). |
| १४ | सार्वजनिक बांधकाम विभागाशी संबंधीत सर्वोच्च न्यायालयाचे निवाडे. |
| १५ | विभागीय मुख्य अभियंत्यांच्या व मुख्य वास्तुशास्त्रज्ञ कार्यालयाची निरिक्षणे. |
| १६ | वन जमिनीचे प्रस्ताव पर्यावरण मंत्रालयाशी संबंधित बाबी. |
| १७ | सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत विषयांचे समन्वयाचे सर्वसाधारण काम. |
| १८ | रस्ते व इमारती पंचवार्षिक योजना वा वार्षिक योजना, तसेच वार्षिक योजनेतील बजेटींग (Annual Budget & Five years plan). |
| १९ | नागरिकांची सनद. |
| २० | खुद्द मंत्रालयीन प्रशासकीय विभागातील सर्व अधिका-यांच्या / कर्मचा-यांच्या सेवा/ प्रशासन/ आस्थापना आणि रचना व कार्यपध्दती विषयकसर्व बाबी. |
| २१ | एच.आर.डी. ट्रेनिंग. |
| २२ | पदे निर्माण करणे व ती पुढे चालू ठेवणे यामध्ये फेरबदल किंवा रुपांतर करणे. |
| २३ | सार्वजनिक बांधकाम विभागाचे (क्षेत्रीय कार्यालयासह) संगणकीकरण. |
| २४ | प्रशासकीय सुधारणा/ पुनर्रचना (Reorganization). |
| २५ | वरिल विषयाचे संदर्भातील नियोजन, अंदाजपत्रके, सुधारित अंदाजपत्रके, कार्यक्रम अंदाजपत्रके विनियोजन लेखे, पुनर्विनियोजन, लोकलेखा / अंदाज समिती सारख्या इतर संसदीय समित्या व तत्सम इतरसमित्यांची त्यांच्या अहवालासहित सर्व प्रकरणे, न्यायालयीन प्रकरणे, महालेखापालांनी केलेली निरीक्षण प्रतिवेदने, भारताचे नियंत्रक व लेखा परिक्षक यांचे वार्षिक अहवाल, लोकायुक्त/ उपलोकायुक्त यांचेकडील प्रकरणे. |
| २६ | गुणवत्ता मंडळ संकल्पना. |
| २७ | आय. एस. ओ. |

**परिशिष्ट – ब**

**सचिव ( बांधकामे )**

| | |
|---|---|
| १ | सहायक वास्तुशास्त्रज्ञ या वर्ग -१ तसेच वर्ग २ पर्यंतच्या अधिकाऱ्यांच्या व कर्मचाऱ्यांच्या सेवा व आस्थापना विषयक सर्व बाबी. |
| २ | उप अभियंता / उप विभागीय अधिकारी /उप विभागीय अभियंता /सहायक अभियंता श्रेणी १ पर्यंतच्या अधिकाऱ्यांच्या व कर्मचाऱ्यांच्या सेवा व आस्थापना विषयक सर्व बाबी. |
| ३ | रस्ते वाहतूक व राजमार्ग मंत्रालय (MORTH)/राष्ट्रीय महामार्ग |
| ४ | खाजगीकरणातून करावयाचे इमारती व राष्ट्रीय महामार्गावरील सार्वजनिक बांधकाम विभागातील सर्व प्रकल्प. |
| ५ | इमारती |
| ६ | केंद्रीय मार्ग निधीची कामे/अंतर राज्य जोडणी ( Inter State Connectivity )/आर्थिक दृष्टया महत्वाचे (Roads of Economic Importance), आंतरराज्य जोडणी (Interstate Connectivity),आर्थिक दृष्टया महत्वाचे प्रकल्प (Roads of Economic Importance) |
| ७ | शासनाच्या ताब्यातील जमिनी व खेळाची मैदाने |
| ८ | इमारतीच्या बाबतीत प्रशासकीय मान्यता देऊन तसेच सदर कामाच्या मंजुरीपेक्षा झालेल्या अतिरिक्त खर्चास मान्यता देणे. |
| ९ | बंदरेविषयक बांधकामे |
| १० | विमानतळ धावपट्टया (Air Port - Air Strips) |
| ११ | लाभक्षेत्र विकास प्राधिकरणांच्या अखत्यारितील रस्ते विकासाची कामे. |
| १२ | खाजगीकरणातून करावयाचे इमारती. |
| १३ | रज्जूमार्ग (Rope Ways) |
| १४ | महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ यांच्याकडील प्रकल्प व इतर अनुषंगिक बाबी. |
| १५ | राष्ट्रीय रस्ते महासभा व इतर संघटना. |
| १६ | महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळासंबंधीच्या धोरणात्मक बाबी. |
| १७ | यंत्रसामुग्री. |
| १८ | दुग्धविकास विषयक बांधकामे. |
| १९ | क्षेत्रीय कार्यालयीन आस्थापना आणि रचना व कार्यपध्दती |
| २० | सिमेंट, पोलाद, डांबर व भांडारे इत्यादीबाबतची प्रकरणे |
| २१ | आमदार निवास, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली, महाबळेश्वर, माथेरान येथील शासकीय निवासस्थानाचे आरक्षण. |
| २२ | प्रकरणे निकाली काढण्याबाबतचा कायदा. |
| २३ | वरील विषयाचे संदर्भातील नियोजन, दरसूची, अंदाजपत्रके, सुधारित अंदाजपत्रके, कार्यक्रम अंदाजपत्रके विनियोजन लेखे, पुनर्विनियोजन, लोकलेखा / अंदाज समिती सारख्या इतर संसदीय समित्या व तत्सम इतर समित्यांची त्यांच्या अहवालासहित सर्व प्रकरणे, न्यायालयीन प्रकरणे, महालेखापालांनी केलेली निरीक्षण प्रतिवेदने, भारताचे नियंत्रक व लेखा परिक्षक यांचे वार्षिक अहवाल, लोकायुक्त / उपलोकायुक्त यांचेकडील प्रकरणे. |
| २४ | खाजगी करणातून घ्यावयाचे दृतमार्गासारखे महाकाय प्रकल्प व खाजगीकरणासंबंधीचे महामंडळ. |